## 'रॅन्समवेअर'चा धोका संपेपर्यंत ATM राहणार बंद

रिझर्व्ह बँकेने देशातील बँकांना तत्काळ आपली एटीएम यंत्रणा अपडेट करण्याचे आदेश दिले असून, अपडेट पूर्ण होत नाही तोपर्यंत एटीएम सेवा सुरू न करण्याचे आदेश दिले आहेत.

मायक्रोसॉफ्ट विंडोजचे जुने व्हर्जन असलेल्या यंत्रणांमध्ये हा मालवेअर ई-मेलच्या माध्यमातून पसरतो. यामुळे अनेक यंत्रणांमधील डेटा लॉक होऊन कामकाज ठप्प झाले आहे.

मालवेअरकडून वापरात असलेले डोमेन रजिस्टर केल्यास त्याचा प्रसार रोखता येतो, हे त्याच्या लक्षात आले. रजिस्टर नसलेल्याच डोमेनला मालवेअरकडून लक्ष्य केले जात असल्याने डोमेन रजिस्टर करणे हा रोखण्याचा मार्ग म्हणजेच किल स्वीच असल्याचे 'मालवेअरटेक'ने ट्विटरवर म्हटले आहे. या किल स्वीचमुळे मालवेअर रोखण्याचा मार्ग मिळाला असला, तरी आधीच ज्या यंत्रणांमध्ये मालवेअर आला आहे, त्यावर उपाय मिळालेला नाही.

दोन दिवसांपुर्वी आंध्र प्रदेश पोलिसांचे १०२ कम्प्युटर हॅक झाल्याची घटना समोर आली आहे. भारतातील सर्व एटीएम यंत्रे 'विंडोज एक्सपी' ऑपरेटिंग सिस्टमवर चालतात. यामुळे अनेक एटीएम यंत्रांवर सायबर हल्ल्याचा धोका निर्माण झाला आ हे. मायक्रोसॉफ्टने काही वर्षांपुर्वीच 'विंडोज एक्सपी'शी निगडीत सुविधा देणं बंद केलं आहे. परंतु कंपनीने आता भारतासह इतर देशांमध्ये विंडोजसाठी अपडेट रिलीज केल्याचे सांगितले आहे.

## पुण्याचे उपमहापौर नवनाथ कांबळे यांचे हृदयविकाराने निधन

**पुण्याचे उपमहापौर नवनाथ कांबळे यांचे मंगळवारी सकाळी हृदयविकाराच्या धक्क्याने निधन झाले. कांबळे रिपाईचे नगरसेवक होते. दलित पॅंथरमध्येही त्यांचा सक्रिय सहभाग होता. १९९७ मध्ये ते नगरसेवक म्हणून प्रथम निवडून आले.**

## राज्यातील तीन परिचारिकांना 'फ्लॉरेन्स नाइटिंगेल' राष्ट्रीय पुरस्कार

रुग्णसेवेचे पवित्र कार्य मनोभावे करताना इतरांना आदर्श ठरेल अशी उल्लेखनीय कामगिरी करणाऱ्या स्वप्ना जोशी, चंद्रकला

चव्हाण आणि कल्पना गायकवाड या महाराष्ट्रातील तीन परिचारिकांचा राष्ट्रपती प्रणव मुखर्जी यांनी 'फ्लॉरेन्स नाइटिंगेल' राष्ट्रीय पुरस्कार देऊन गौरव केला.

राष्ट्रपती भवनात झालेल्या कार्यक्रमात देशभरातील एकूण ३५ परिचारिकांना हा पुरस्कार प्रदान करण्यात आला.

'फ्लॉरेन्स नाइटिंगेल' यांच्या जन्मदिन 'आंतरराष्ट्रीय परिचारिका दिन' म्हणून साजरा केला जातो. याचे औचित्य साधून या पुरस्कारांचे वितरण केले जाते. तसेच सन्मानपदक, प्रशस्तिपत्र आणि २० हजार रुपये रोख असे या पुरस्काराचे स्वरूप आहे. हे पुरस्कार १९७३ पासून प्रदान करण्यात येतात.

## निर्भया निधीतून रेल्वे स्थानकांवर सीसीटीव्हीसाठी पाचशे कोटी

देशातील ९०० रेल्वे स्टेशन्सवर भारतीय रेल्वे निर्भया निधीतून सीसीटीव्ही टेहळणी प्रणाली बसवण्यात येणार आहे. रेल्वे परिसरातील सुरक्षेसाठी त्यासाठी पाचशे कोटी रुपये मंजूर करण्यात आले आहेत.

केंद्र सरकारने निर्भया प्रकारणानंतर २०१३ मध्ये एक हजार कोटींचा निधी निर्भया निधी म्हणून वेगळा ठेवला होता, त्यात सरकार व स्वयंसेवी संस्थांनी महिलांच्या संरक्षणासाठी केलेल्या प्रयत्नांना प्रोत्साहन देण्यात येणार आहे.

## पर्यटकांसाठी गोवा टुरिझमची ‘हॉप ऑन हॉप ऑफ’ बससेवा

गोव्यातील पर्यटनाला चांगला वाव मिळावा म्हणून गोवा पर्यटन विभागातर्फे नवीन बससेवेची सुरुवात करण्यात आली. बहुप्रतिक्षित अशा ‘हॉप ऑन हॉप ऑफ’ बससेवेचा गोव्याचे पर्यटनमंत्री मनोहर अजगांवकरांच्या हस्ते पंजिम येथील पर्यटन भवनात शुभारंभ करण्यात आला.

गोव्यात येणाऱ्या पर्यटकांना या बसमधून प्रवास करत गोव्यातील विविध पर्यटनस्थळांना भेट देता येईल.'ओपन टॉप डबल डेकर' आणि 'हायडेक' स्वरुपातील या बस आहेत. पंजिम, मिरामार आणि दोना पावला परिसरातील प्रसिध्द पर्यटनस्थळांचा समावेश सुरुवातीच्या टप्प्यात करण्यात आला आहे.

गोव्यातील पर्यटन भवनातून सुरू होणारी ही आरामदायी, शानदार आणि आलिशान सफर पणजिम चर्च, पॅलेस ऑफ आर्च बिशप, मिरामार बिच, गोवा सायन्स सेंटर, दोना पावला, कला अॅकॅडमी, भगवान महावीर गार्डन, पणजिम मार्केट, कॅसिनो पॉइंट, रिव्हर क्रुझ पॉइंट, गोवा स्टेट म्युझिअम, रविंद्रनाथ पट्टो सर्कल अशा विविध पर्यटनस्थळांना भेट देत शेवटी पर्यटन भवनात येऊन संपेल.

स्थानिक भाषेसह विविध भाषेत पर्यटनस्थळांची माहिती, सीसीटीव्ही, जीपीएस ट्रॅकिंग, प्रशिक्षित टुर गाईड, पर्यटकांसाठी समन्वयक अशी विविध वैशिष्ट्ये असलेली ही बस सेवा दर दिवशी सकाळी ९ ते संध्याकाळी ६ पर्यंत चालविण्यात येईल. **'हॉप ऑन हॉप ऑफ' मध्ये सुरुवातीला चार बसचा समावेश करण्यात आला असून, पुढील वर्षात आणखी सहा बसची भर पडणार आहे.**

## मिसबाह आणि युनिस यांचा क्रिकेटला अलविदा

मालिकेतील आणि कारकीर्दीतील अखेरच्या कसोटी सामन्यात विजय मिळवण्याचे भाग्य पाकिस्तानचा कर्णधार मिसबाह-उल-हक आणि युनिस खान यांच्या नशिबात आले. वेस्ट इंडिजविरुद्धच्या तिसऱ्या कसोटी सामन्यात १०१ धावांनी विजय मिळवत पाकिस्तानने मालिका २-१ अशी खिशात टाकली आणि आपल्या दोन अनुभवी खेळाडूंना गोड निरोप दिला.

## भारतीय महीला क्रिकेट टीमची विश्वविक्रमाला गवसणी

भारतीय महीला क्रिकेट टीमने विश्वविक्रमाला गवसणी घातली आहे. आयर्लंडविरूद्धच्या सामन्यात दीप्ती शर्मा आणि पूनम राउत या दोघींनी इतिहास रचला आहे. या दोघींनी पहिल्या विकेटसाठी तब्बल ३२० धावांची भागीदारी केली.

आंतरराष्ट्रीय महीला एकदिवसीय क्रिकेटमधील ही कोणत्याही विकेटसाठी सर्वात मोठी भागीदारी ठरली आहे. दीप्ती शर्माने १८८ धावांची खेळी केली मात्र, महीला क्रिकेटमध्ये व्दिशतक झळकविणारी दुसरी महिला खेळाडू होण्याची तिची संधी हुकली.

दीप्तीने केलेल्या १८८ धावा हा भारतीय महीला क्रिकेटमधला नवा विक्रम ठरला. शिवाय महिला आंतरराष्ट्रीय क्रिकेटमधील ही दुसरी सर्वोच्च वयक्तिक धावसंख्या ठरली आहे.

## मॅक्रॉन यांनी स्वीकारली फ्रान्सची सूत्रे

इमॅन्यूएल मॅक्रॉन यांनी आज फ्रान्सचे २५वे अध्यक्ष म्हणून सूत्रे स्वीकारली. मॅक्रॉन हे फ्रान्सचे सर्वांत तरुण अध्यक्ष ठरले आहेत. त्यांनी मावळते अध्यक्ष फ्रान्स्वा ओलॉंद यांच्याकडून अध्यक्षपदाची सूत्रे स्वीकारली.

इन्व्हेस्टमेंट बॅंकर असलेले मॅक्रॉन हे ओलॉंद यांच्याच मंत्रिमंडळात अर्थमंत्री होते.

## लष्करी सामर्थ्यात अमेरिका अव्वल स्थानावर

जगभरात प्रत्येक देशाचा शस्त्रास्त्रांच्या भंडारातून स्वतःला शक्तिशाली बनवण्याचा प्रयत्न सुरू आहे. तरीही सर्व देशांमध्ये अमेरिका लष्करी सामर्थ्यात सर्वात शक्तिशाली देश असल्याचे समोर आले आहे.

अमेरिका चीन आणि रशियापेक्षा तीनपटीने स्वतःच्या लष्करावर पैसा खर्च करत असल्याचीही माहिती मिळाली आहे. गेल्या काही दिवसांपूर्वीच ग्लोबल रँकिंगमधून ही गोष्ट उघड झाली आहे.

तसेच या यादीत भारत चौथ्या क्रमांकावर आहे. भारत एकूण ५१ बिलियन डॉलर लष्करावर खर्च करतो.

अमेरिका स्वतःच्या संरक्षणासाठी जवळपास ६०० बिलियन डॉलर एवढा खर्च करतो. तर रशिया एका वर्षात जवळपास ५४ बिलियन डॉलर खर्च करतो, चीन १६१ बिलियन डॉलर खर्च करतो.